सन २०११-१२ या आर्थिक वर्षात ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघु पाटबंधारे योजनांसाठी मागणी क्रमांक एल-३ लेखाशिर्ष २७०२ ४७५४ अंतर्गत निधी वितरण करणेबाबत.(योजनांतर्गत)

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्र. लपायो-२०११/प्र. क्र.१६०/जल-४
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक :- १७ डिसेंबर, २०११

**वाचा :-**

१ शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक अंदाज-२०.११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दिनांक ०६ मे, २०११
२ शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक- असक-२०११ /प्र.क्र.२५/जल-११, दिनांक २० मे २०११
३ शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अंदाज-२०.११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दिनांक २१ सप्टेंबर, २०११
४ मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे ( स्थानिक स्तर) पुणे यांचे जा.क्र.मुअ/लपा /आ-३/५२२१, दिनांक १२ ऑक्टोबर, २०११
५ मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे ( स्थानिक स्तर) पुणे यांचे जा.क्र.मुअ/लपा /आ-३/५७५२, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११

**प्रस्तावना :-**

सन २०११-१२ या वर्षाच्या अर्थसंकल्पामध्ये मागणी क्रमांक एल-३, २७०२ लहान पाटबंधारे, लेखाशिर्ष २७०२ ४७५४ अंतर्गत ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघु पाटबंधारे योजनांसाठी रुपये १०० लक्ष एवढी तरतूद मंजूर आहे. संदर्भ क्र. ४ व ५ येथील अनुक्रमे दिनांक १२ ऑक्टोबर, २०११ व दिनांक १५ नोव्हेंबर, २०११ च्या मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे यांच्या पत्रांन्वये ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघु पाटबंधारे योजनासाठी निधी मागणीचे प्रस्ताव शासन प्राप्त झाले आहेत. वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र. ३ येथील दिनांक २१ सप्टेंबर, २०११ च्या परिपत्रकांन्वये अर्थसंकल्पीत निधीच्या ५० टक्के निधी वितरणास मुक्त केला आहे. त्यानुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासन खालील प्रमाणे निर्णय देत आहे.

शासन निर्णय :-

सन २०११-१२ या वर्षाच्या अर्थसंकल्पामध्ये मागणी क्रमांक एल-३ लेखाशिर्ष २७०२ ४७५४ अंतर्गत अंर्थकल्पीत झालेल्या रुपये १०० लक्ष निधी मधुन रुपये ५० लक्ष निधी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या सहपत्रात नमूद योजनांसाठी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील प्रमाणे वितरीत केलेली तरतूद या शासन निर्णयासोबतच्या सहपत्रात नमूद कामांना उपलब्ध करुन देण्याकरीता संबंधित जिल्हा परिषदांमध्ये वितरीत करण्यासाठी सदर वितरीत तरतूद अधिक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) मंडळ, ठाणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती यांचे अधीनस्त ठेवण्यात येत आहे. या शासन निर्णयान्वये वितरीत अनुदानाचे संबंधित अधिक्षक अभियंता यांनी संबंधित जिल्हा परिषदेच्या सिंचन विभागास व ठेव कामासाठी संबंधित लघु पाटबंधारं (स्थानिक स्तर) विभागास यथोचितरित्या वाटप करावे व जिल्हा परिषद, सिंचन विभाग यांनी लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) विभागास वितरीत करावयाचे अनुदान १५ दिवसांत उपलब्ध करुन दयावे. निधी ज्या कामासाठी मंजूर केला आहे त्याच कामासाठी वापरण्यात यावा. तसेच मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च करण्यात येऊ नये.

३. लघु पाटबंधारे योजनांची कामे गुणवत्तापूर्वक झाल्याचे सक्षम अधिकाऱ्याने तपासून प्रमाणित करणे बंधनकारक असेल. तसेच योजना पूर्ण झाल्यानंतर योजना हस्तांतरणाची कार्यवाही तात्काळ करावी. योजना पूर्ण झाल्यानंतरचे छायाचित्र घेण्यात यावे व सदर छायाचित्र देयकासोबतच्या नस्तीत ठेवण्यात यावे.

४. या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक एल-३, २७०२ लहान पाटबंधारे - (०२) लहान पाटबंधा-यांची कामे, महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ च्या कलम १८७ अन्वये जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदान (०२)(०२) लहान पाटबंधा-यांची कामे- राज्य एकत्रित निधी योजना (२७०२ ४७५४) ३१ सहायक अनुदाने योजनांतर्गत दत्तमत या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. अधीक्षक अभियंता, लघुपाटबंधारे (स्था.स्त) मंडळ, ठाणे, नाशिक, औरंगाबाद व अमरावती यांनी त्यांच्या विभागाकडील खर्चाची एकत्रित विवरणपत्रे या विभागाकडे व मुख्य अभियंता, लघुपाटबंधारे (स्था.स्त) पुणे यांच्याकडे प्रत्येक महिन्याच्या १५ तारखेपर्यंत पाठविण्याची व्यवस्था करावी. मुख्य अभियंता लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक ०८ मार्च, २००७ च्या शासन परिपत्रकात नमूद केल्याप्रमाणे सर्व वित्तीय बाबींच्या समन्वयाची

जबाबदारी समन्वयक ( कोऑरर्डीनेटर ) म्हणून पार पाडण्याच्या दृष्टीने सर्व आवश्यक उपाययोजना करव्यात.

६. अधीक्षक अभियंता, लघुपाटबंधारे (स्था.स्त) मंडळ, ठाणे, नाशिक, औरंगाबाद व अमरावती यांनी उपरोक्त प्रमाणे निधी विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र आवश्यक त्या माहितीसह तात्काळ शासनास सादर करावे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक अंदाज-२०.११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दिनांक ०६ मे, २०११ व दिनांक २१ सप्टेंबर, २०११ नुसार निश्चित केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१११२१७०५५००३१२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सहपत्र :- वरील प्रमाणे

( सुनील चव्हाण )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त ( विकास ) ठाणे, नाशिक, औरंगाबाद व अमरावती
२) मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) महाराष्ट्र राज्य, पुणे
३) महालेखापाल-१, महाराष्ट्र, मुंबई ( लेखा परिक्षण व लेखा अनुज्ञेयता)
४) महालेखापाल-२, महाराष्ट्र, नागपूर,(लेखा परिक्षण व लेखा अनुज्ञेयता)
५) मा. मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
६) मा. राज्य मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
७) अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर ) मंडळ, ठाणे, नाशिक, औरंगाबाद व अमरावती
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी, धुळे, जालना व वाशिम.
९) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी, धुळे, जालना व वाशिम.
१०) कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर ) विभाग, रत्नागिरी, धुळे, जालना व वाशिम.
११) कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे,जिल्हा परिषद, रत्नागिरी, धुळे, जालना व वाशिम.
१२) मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद, रत्नागिरी, धुळे, जालना व वाशिम.
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी, धुळे, जालना व वाशिम.
१४) प्रधान सचिव (जलसंधारण) यांचे स्वीय सहायक, ग्रामविकास व जलसंधारण विभाग.
१५) नियोजन विभाग (का. १४४१).
१६) वित्त विभाग ( व्यय १५ व अर्थ १७ )
१७) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१८) ग्रा.वि. व ज.सं.वि. का.क्र. जल-११,
१९) निवड नस्ती, कार्यासन क्र. जल-४, ग्रामविकास व जलसंधारण विभाग.

**मागणी क्रमांक एल-३ २७०२, लहान पाटबंधारे लेखाशिर्ष२७०२ ४७५४ अंतर्गत ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघु पाटबंधारे योजनांसाठी निधी वितरण करण्याबाबतचा शासन निर्णय क्र. लपायो-२०११/प्र.क्र.१६०/जल-४, दिनांक १७ डिसेंबर, २०११ चे सहपत्र (रू. लक्ष)**

| अ.क्र | योजनेचे नाव | तालुका | जिल्हा | उर्वरीत कि मंत | वितरीत निधी | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | भूसंपादन | कामे | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | आंत्रवली | संगमेश्वर | रत्नागिरी | ५८.०३ | ०.०० | ५.६७ | ५.६९ |
| २ | छावडी साठवण बंधारा | साक्री | धुळे | ०.०० | ०.०० | १४.९८ | १४.९८ |
| ३ | घाणेगांव साठवण बंधारा | साक्री | धुळे | ०.०० | ०.०० | ५.०० | ५.०० |
| | **उर्वरीत महाराष्ट्र एकूण** | | | **५८.०३** | **०.००** | **२५.६५** | **२५.६७** |
| १ | अंतरवेली टेंभी जलबांध क्र.१ | घनसांगवी | जालना | ४.३४ | ०.०० | ३.०७ | ३.०७ |
| | अंतरवेली टेंभी जलबांध क्र.२ | घनसांगवी | जालना | ५.४७ | ०.०० | ४.१९ | ४.१९ |
| | अंतरवेली टेंभी जलबांध क्र.३ | घनसांगवी | जालना | ६.५१ | ०.०० | ३.९३ | ३.९३ |
| | **मराठवाडा** | | | **१६.३२** | **०.००** | **११.१९** | **११.१९** |
| ५ | माळेगांव किन्ही साठवण तलाव, | मालेगांव | वाशिम | १३०.७३ | ०.०० | १३.१४ | १३.१४ |
| | **एकूण विदर्भ** | | | **१३०.७३** | **०.००** | **१३.१४** | **१३.१४** |
| | **एकूण महाराष्ट्र** | | | **२०५.०८** | **०.००** | **४९.९८** | **५०.००** |

C:\Documents and Settings\my pc\Local Settings\Temp\wzf1e1\gov_0-100_50__11-12